अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी-गट-ब(राजपत्रित) संवर्गातील अधिका-यांच्या बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन आदेश क्रमांक:- इएसटी-२०१४/प्र.क्र. १४१/का-१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ०१ जून, २०१५

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व (५) नुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी गट-ब (राजपत्रित) संवर्गातील खाली नमुद अधिका-यांची सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिका-याचे नांव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्रीमती मनिषा र. माने, संशोधन अधिकारी (नियोजन) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सांख्यिकी अधिकारी, राज्य निवडणूक आयोग कार्यालय, मुंबई (रिक्त पदी) |
| २. | श्री. विजय दि. भोपळे, सांख्यिकी अधिकारी (पदस्थापनेच्या प्रतिक्षेत) | संशोधन अधिकारी (नियोजन) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई (श्रीमती मनिषा र. माने यांचे जागी) |

२. संबंधित कार्यालय प्रमुखांनी श्रीमती मनिषा र. माने यांना तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच कार्यमुक्तीनंतर श्रीमती मनिषा र. माने यांनी बदली केलेल्या पदावर रूजू व्हावे व त्या पदाचा कार्यभार स्वीकारावा तसेच श्री. विजय दि. भोपळे यांनी त्यांना पदस्थापित केलेल्या पदावर रूजू व्हावे व त्या पदाचा कार्यभार स्वीकारावा.

३. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रूजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिका-याशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्यावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्यावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिका-यांच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक

कोषागार कार्यालयाने पारित करू नये. तसेच, अद्यावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्यावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची राहील.

४. बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

५. काही अधिकारी बदली आदेशांचे पालन करत नाहीत. त्यामुळे प्रशासकीय कामकाजात अडथळा उत्पन्न होतो असे निदर्शनास आले आहे. यास्तव संबंधित अधिका-यांनी त्यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधितच बदलीच्या ठिकाणी रूजू व्हावे. याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधितांविरूध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

६. श्री. विजय दि. भोपळे आणि श्रीमती मनिषा र. माने यांना त्यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ च्या नियम २८ नुसार पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहील तसेच त्यांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी नियमानुसार प्रवासभत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

७. बदली करण्यात आलेल्या अधिका-यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्वीकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१५०६०११६१४३६६८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400067, st=Maharashtra, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2015.06.02 10:59:36 +05'30'

**( तु. पु. हिर्लेकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर

२) मा. मुख्यमंत्री/मा. मंत्री (नियोजन)/मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई

४) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

५) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई

६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

८) सर्व सह सचिव/उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

९) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, नवी मुंबई.

१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

११) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई-३२, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१

१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१३) श्री. विजय दि. भोपळे, सांख्यिकी अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांचे मार्फत)

१४) श्रीमती मनिषा र. माने, संशोधन अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

१५) निवड नस्ती.